अकृषि विद्यापीठे तसेच संलग्नित मान्यता प्राप्त अशासकीय अनुदानित महाविद्यालये/ तंत्रशास्त्र, औषधनिर्माण शास्त्र वास्तुशास्त्र महाविद्यालये/ तंत्र निकेतन/ तसेच सेवानिवृत्ती वेतन योजना लागू असलेली शासकीय अनुदानित अभिमत विद्यापीठे यातील १००% अनुदानित पदावरील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना नवीन "परिभाषित अशंदान निवृत्तीवेतन योजने" अंतर्गत अंशदानाच्या रकमा परत करण्याबाबची कार्यपध्दती.

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अंनियो- २०१०/प्र.क्र.६७८/१०/विशि-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

तारीख: २१ डिसेंबर, २०१८

**वाचा :-**

१) शासन निर्णय वित्त विभाग,क्र. अंनियो-१००५/प्र.क्र. १२६/सेवा-४, दि.३१ ऑक्टोबर, २००५.

२) शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक. अंनियो-२०१०/(६७८/१०)/विशि-१, दिनांक २५.०३.२०११

३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अंनियो-१००५/ प्र.क्र.१/सेवा-४, दि. १२ नोव्हेंबर, २०१०.

४) शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक. अंनियो-२०१०/(६७८/१०)/विशि-१, दिनांक २९.१०.२०१२

५) शासन परिपत्रक उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक. अंनियो-२०१०/(६७८/१०)/विशि-१, दिनांक १३.०३.२०११

६) शासन शुध्दीपत्रक उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक. अंनियो-२०१०/(६७८/१०)/विशि-१, दिनांक ३०.०८.२०१३

७) शासन शुध्दीपत्रक उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक. अंनियो-२०१०/(६७८/१०)/विशि-१, दिनांक ०३ मार्च, २०१७

**प्रस्तावना :-**

उच्च व तंत्र शिक्षण विभागांतर्गत असलेल्या अकृषि विद्यापीठे संलग्नित मान्यताप्राप्त अशासकीय अनुदानित महाविद्यालये/ तंत्रशास्त्र, औषधनिर्माण शास्त्र, वास्तुशास्त्र महाविद्यालये / तंत्रनिकेतन / औद्योगिक प्रशिक्षण संस्था/ व्यवसाय शिक्षणाकडील अनुदानित तंत्रशाळा/ प्रशाळा व कनिष्ठ महाविद्यालये तसेच सेवानिवृत्ती वेतन योजना लागू असलेली शासकीय अनुदानित अभिमत विद्यापीठे यांतील १०० % अनुदानित पदावरील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसाठी दि.२५ मार्च, २०११ च्या शासन निर्णयान्वये नवीन "परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू करण्यात आलेली आहे. या शासन निर्णयातील परिच्छेद २० नुसार कर्मचाऱ्याचा अकाली मृत्यू झाल्यास अथवा

कर्मचाऱ्याने सेवात्याग करण्याचा निर्णय घेतल्यास अशा स्वरूपाच्या प्रकरणी सेवांत लाभ देण्यासंबंधीच्या तरतूदी संदर्भात वित्त विभागाचे वेळोवेळी निर्गमित होणारे आदेश लागू राहतील, असे नमूद केले आहे. त्याप्रमाणे वित्त विभागाने दि.१२ नोव्हेंबर, २०१० च्या शासन निर्णयान्वये सदरहू योजना लागू असलेल्या कर्मचाऱ्यांच्या अंशदानाच्या रकमा परत करण्याबाबतची कार्यपध्दती विहित केलेली आहे. तसेच यासंदर्भातील सूचना योग्य त्या फेरफारासह संबंधित प्रशासकीय विभागांनी निर्गमित कराव्यात असे सूचित केले. त्यानुसार या विभागाच्या अधिनस्त असलेल्या व सदरहू योजना लागू असलेल्या कर्मचाऱ्याच्या अंशदानाच्या रकमा परत कारण्याबाबतची कार्यपध्दती विहित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

संदर्भाधीन क्र.२ येथील दि.२५ मार्च, २०११ अन्वये ज्या कर्मचाऱ्यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू करण्यात आलेली आहे. अशा राज्यातील अकृषि विद्यापीठे व संलग्नित मान्यताप्राप्त अशासकीय अनुदानित महाविद्यालये/तंत्रशास्त्र, औषधनिर्माण शास्त्र, वास्तुशास्त्र महाविद्यालये/ तंत्र निकेतने तसेच सेवानिवृत्ती वेतन योजना लागू असलेली शासकीय अनुदानित अभिमत विद्यापीठे यातील १००% अनुदानित पदावरील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना खालील परिस्थितीत रकमा परत करण्याबाबत सोबत जोडलेल्या जोडपत्र-१ प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी :-

१) कर्मचाऱ्याचा सेवत असताना मृत्यू झाल्यास,

२) कर्मचाऱ्याने नियत वयोमानापुर्वी (यथास्थिती ५८/६०/६२/६५) सेवात्याग केल्यास,

३) कर्मचारी नियत वयोमानानुसार (यथास्थिती ५८/६०/६२/६५) सेवानिवृत्त झाल्यास,

४) दि.०१ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर राज्यातील दुसऱ्या सेवेत रूजू झालेल्या ज्या कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ च्या तरतुदी लागू ठरल्या आहेत, अशा कर्मचाऱ्यांची नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेखाली वर्गणी कपात करण्यात आली असल्यास.

२. नवीन परिभाषित अंशदान योजने अंतर्गत प्रदान करण्यात येणाऱ्या परताव्याची रक्कम खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

Demand No. G - 99
8342- Other Deposits
00 - Dummy Value
117- Define Contribution Pension Scheme for Government Employees
(04) – Define Contribution Pension Scheme
(04) (09) – Define Contribution Scheme-Refund of contribution Collected under DCPS to Non-Agricultural University's and affiliated approved and aided Non-Government College's and their employees.
(8342 0221)

३. या योजने अंतर्गत रकमा संबंधित कर्मचाऱ्यांना / कर्मचाऱ्यांच्या वारसाला उपरोक्त लेखाशीर्षातून परतावा मंजूर करण्याकरीता विभागीय सहसंचालक यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. यासाठी होणाऱ्या खर्चाची तरतुद उपरोक्त लेखाशिर्षात करावयाची अर्थसंकल्पीय तरतुद उपराज्य अभिलेख देखभाल अभिकरण यांनी प्रत्येक आर्थिक वर्षात करावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१५२/१८/ सेवा-४, दि.१७.०७.१८ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२२११५३४१०४३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth Kharat

Digitally signed by Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f8cb55012423727bece629d954713c1ec2962a9ca9b909643170e56321cfd24, cn=Siddharth Kharat
Date: 2018.12.21 16:29:25 +05'30'

**(सिध्दार्थ खरात)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, विधानभवन, मुंबई,
३) कुलगुरु, सर्व अकृषि विद्यापीठे,
४) कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे,
५) कुलसचिव, डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे,
६) कुलसचिव, गोखले अर्थशास्त्र संस्था, पुणे,
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १ व २ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,(५ प्रती)
८) महालेखापाल (लेखा परीक्षा), १ व २ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,(५ प्रती)
९) सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, ,
१०) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
११) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१२) संचालक, राज्य अभिलेख देखभाल अभिकरण ,
१३) सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण/तंत्रशिक्षण,
१४) संचालक, व लेखा व कोषागारे, (५ प्रती ),
१५) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
१६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१७) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१८) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई,
१९) अवर सचिव, वित्त विभाग (सेवा-४/सेवा-९/कोषा-५/व्यय-५/अर्थ-८), मंत्रालय, मुंबई
२०) निवड नस्ती (वि.शि.१).

## जोडपत्र - १

**(उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांकः अंनियो-२०१०/प्र.क्र.६७८/१०/विशि-१, दिनांक २१ डिसेंबर, २०१८ च्या परिच्छेद -१ मध्ये निर्दिष्ट केलेले)**

कर्मचारी सेवेत असताना मृत झालेल्या/नियत वयोमानापूर्वी (यथास्थिती, ५८/६०/६२/६५ वर्षे) सेवानिवृत्ती घेतलेल्या अथवा अन्य प्रकारे शासन सेवा सोडलेल्या /दिनांक ०१.११.२००५ नंतर शासन सेवेत नियुक्त झाल्यानंतर पुढे शासनाने पूर्वीची सेवा ग्राह्य धरून अशा कर्मचाऱ्याला दि.०१.११.२००५ पूर्वीची मानीव तारीख दिलेल्या कर्मचाऱ्यांच्या संदर्भात करावयाची कार्यपध्दती.

**१) कर्मचाऱ्याच्या वारसाने/कर्मचाऱ्याने करावयाची कार्यवाही:-** परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू असलेल्या कर्मचाऱ्याचा सेवेत असताना मृत्यू झाला, नियत वयोमानानुसार (यथास्थिती ५८/६०/६२/६५) सेवानिवृत्ती घेतलेल्या कर्मचाऱ्याने अथवा त्याने नामनिर्देशित केलेल्या व्यक्तीने किंवा जर त्या कर्मचाऱ्याने नामनिर्देशन केले नसेल तर शासनाच्या सध्याच्या भविष्य निर्वाह निधी नियमानुसार नामनिर्देशन ठरू शकरणाऱ्या वारसाने त्या कर्मचाऱ्याच्या मृत्यू प्रमाणपत्रासह त्या कर्मचाऱ्याच्या खात्यावर जमा असलेली रक्कम परत मिळण्यासाठी संबंधित महाविद्यालयाचे प्राचार्य/विद्यापीठाचे कुलसचिव यांच्याकडे यासोबतच्या विहित नमुन्यातील (नमुना-अ) अर्ज सादर करावा. अशीच कार्यवाही सेवा समाप्त झालेल्या/पूर्वीची सेवा ग्राह्य धरलेल्या कर्मचाऱ्याने करावी.

**२) प्राचार्य/कुलसचिव यांनी करावयाची कार्यवाही:-** प्राचार्य/कुलसचिव यांनी कर्मचाऱ्याच्या वारसाच्या अर्जाची प्रत व मृत्यू प्रमाणपत्राची प्रत/कर्मचाऱ्याच्या अर्जाची प्रत, तसेच कर्मचारी मृत झाला/कर्मचाऱ्याची सेवा समाप्त झाली त्या वर्षाच्या/ त्या आधीच्या आर्थिक वर्षाच्या लेखा विवरणाची (Statement of Accounts) प्रत यासह सोबत जोडलेल्या नमुन्यातील (नमुना-ब) आणि (नमुना-क) अर्ज कर्मचारी शेवटी ज्या कोषागाराच्या (DTO) अखत्यारितील कार्यालयात कार्यरत असेल अशा कार्यालयाला म्हणजे संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण/तंत्र शिक्षण यांना सादर करावा.

**३) विभागीय सहसंचालक/उपराज्य अभिलेख देखभाल अभिकरणाने करावयाची कार्यवाही:-** प्राचार्य/कुलसचिव यांनी (नमुना-ब आणि नमुना-क) मधील अर्ज सादर केल्यानंतर संबंधित कर्मचाऱ्याच्या खात्यात जमा असलेल्या वर्गणीची रक्कम त्यांच्याकडील ब्रॉडशीट व लेजर वरून तपासून घ्यावीत. अशा प्रत्येक प्रकरणी रक्कम तपासून विभागीय सहसंचालक/ (DTO) यांनी ताळमेळाच्या विहित नमुन्यातील विवरणपत्राच्या (नमुना-ड) व परतावा प्रदान आदेश (नमुना-ई) या प्रतींवर साक्षांकन करावे.

त्यानंतर विभागीय सहसंचालक या आदेशाच्या आधारे कोषागारात देयक सादर करतील. हे देयक साधी पावती (Simple Receipt) (नमुना ४५-अ) मध्ये सादर करण्यात यावे.

परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजने अंतर्गत प्रदान करण्यात येणारी परताव्याची रक्कम

Demand No. G - 99
8342- Other Deposits
00 - Dummy Value
117- Define Contribution Pension Scheme for Government Employees
(04) – Define Contribution Pension Scheme

(04) (09) – Define Contribution Scheme-Refund of contribution Collected under DCPS to Non-Agricultural University's and affiliated approved and aided Non-Government College's and their employees.
(8342 0221)

या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

**४) देय व्याज:- (अ)** मृत कर्मचाऱ्याच्या वारसार कर्मचाऱ्याच्या अंशदानाबरोबरच शासनाचे अंशदान व त्यावरील व्याज देय राहील. **(ब)** नियत वयोमानापूर्वी निवृत्ती घेतल्यास कर्मचाऱ्यास त्याच्या स्वत:च्या अंशदानाबरोबर शासनाचे अंशदान व त्यावरील व्याज देय राहील. **(क)** शासनाने सक्तीने सेवानिवृत्त केलेल्या कर्मचाऱ्याच्या बाबतीत परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेखालील जमा रकमेच्या ताळमेळानंतर त्या कर्मचाऱ्यास त्याचे व शासनाचे अंशदान व त्यावरील सक्तीच्या सेवानिवृत्तीच्या दिनांकाच्या आदल्या दिववापर्यंतचे व्याज देय राहील. **(ड)** पूर्वीची सेवा जोडून दिलेल्या कर्मचाऱ्यास केवळ त्याचे अंशदान व त्यावरील व्याज परत मिळेल. (ई) नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यास त्याच्या स्वत:च्या अंशदाना बरोबर शासनाचे अंशदान व त्यावरील व्याज देय राहील.

**************

**नमुना - अ**

**परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजने अंतर्गत कर्मचाऱ्यांच्या लेख्यात जमा रकमेच्या परताव्यासंबंधी मृत कर्मचाऱ्यांच्या वारसाने/सेवा समाप्त झालेल्या कर्मचाऱ्यांने करावयाचा अर्ज.**

वारसाचे नाव/कर्मचाऱ्याचे नाव व पूर्ण
पत्ता :
दिनांक :

प्रति,

प्राचार्य/कुलसचिव,
विद्यापीठ/महाविद्यालय/संस्थेचे नाव व पत्ता

विषय :-परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजने अंतर्गत जमा असलेल्या रकमेच्या परताव्याबाबत.

महोदय,

(१) माझे / माझी / माझा / पती/ पत्नी / भाऊ / बहिण / मुलगा / मुलगी / कै. श्री./श्रीमती ......... हे/ह्या उच्च व तंत्र शिक्षण विभागाअंतर्गत असलेल्या अकृषि विद्यापीठे व संलग्नित मान्यता प्राप्त अशासकीय अनुदानित महाविद्यालये/तंत्रशास्त्र, औषधनिर्माण शास्त्र, वास्तुशास्त्र महाविद्यालये/ तंत्र निकेतने तसेच सेवानिवृत्ती योजना लागू असलेली शासकीय अनुदानित अभिमत विद्यापीठे यातील १००% अनुदानित पदावरील शिक्षक-शिक्षकेतर कर्मचारी या शासनाच्या सेवेत दि.----- ते दि.----- कार्यरत होते/होत्या. शासन सेवेत असताना दि.------ रोजी त्यांचे निधन झाले आहे. त्यामुळे त्यांची सेवा दि.------ पासून संपुष्टात आली आहे. सेवेत असताना ते / त्या परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना या योजनेचे सभासद होते/होत्या.

त्यांनी परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजने अंतर्गत रक्कम मिळण्यासाठी मला नामनिर्देशित केले आहे / त्यांनी परिभाषित अंशदान योजने अंतर्गत रक्कम मिळण्यासाठी मला नामनिर्देशित केले नाही. परंतु भविष्य निर्वाह निधी नियम, १९ मधील तरतुदींच्या अनुषंगाने मी त्यांचा वारसदार ठरतो/ठरते. (लागू नसल्यास ते खोडावे) त्यामुळे त्यांच्या लेख्यात जमा असलेल्या रकमेचा परतावा मला मिळावा, ही विनंती. यासोबत कै. श्री./ श्रीमती.------ यांच्या मृत्यूच्या दाखल्याची मूळ प्रत जोडत आहे. त्यांच्याशी माझे नाते पुढीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | नाव | मयत कर्मचाऱ्याशी नाते. |
|---|---|---|

(२) मी खाली सही करणार श्री./ श्रीमती.--------- उच्च व तंत्र शिक्षण विभागाअंतर्गत असलेल्या अकृषि विद्यापीठे व संलग्नित मान्यता प्राप्त अशासकीय अनुदानित महाविद्यालये/तंत्रशास्त्र, औषधनिर्माण शास्त्र, वास्तुशास्त्र महाविद्यालये/ तंत्र निकेतने तसेच सेवानिवृत्ती योजना लागू असलेली शासकीय अनुदानित अभिमत विद्यापीठे यातील १००% अनुदानित पदावरील शिक्षक-शिक्षकेतर कर्मचारी या शासनाच्या सेवेत दि.----- ते दि.------ कार्यरत होतो/होते. मी सेवेचा राजीनामा दिल्यामुळे / मला बडतर्फ करण्यात आल्यामुळे / माझी सेवा----- या कारणाने संपल्याने (कारण नमूद करावे) दि.---- पासून संपुष्टात आली आहे. मी सेवेत असताना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना या योजनेचा सभासद होतो. माझी सेवा संपुष्टात आल्यामुळे माझ्या लेख्यात जमा असलेल्या रकमेचा परतावा मला मिळावा, ही विनंती. याबाबत आवश्यक ते तपशील खालीलप्रमाणे देत आहे. माझ्या वेतनामधून माहे-----२००--- मध्ये शेवटची वजाती------- कोषागारातून करण्यात आली असून सदर देयकाचा प्रमाणक क्र.------ दि.----- असा आहे.

(३) कर्मचाऱ्याचा आवश्यक तपशील खालीलप्रमाणे आहे.

| कर्मचाऱ्याचे नाव | लेखा क्र. | सेवेत रूजू झाल्याचा दिनांक | मृत्यूच्या वेळी / सेवा समाप्तीच्या वेळी धारण केलेले पद | अर्जदाराचा/कर्म-चाऱ्याचा सध्याचा पत्ता. |
|---|---|---|---|---|
| | | | | |

आपला/आपली विश्वासू,

(---------------)

सोबत :- मृत्यूचा दाखला

स्थळ :-

दिनांक :-

**नमुना - ब**

**प्राचार्य/कुलसचिव यांनी परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजने अंतर्गत कर्मचाऱ्यांच्या लेख्यात जमा रकमेची माहिती विभागीय सहसंचालक/उपराज्य अभिलेख देखभाल अभिकरण यांच्याकडून प्राप्त करण्याकरीता करावयाचा अर्ज.**

कार्यालयाचे नाव व पूर्ण पत्ता :
दिनांक :

प्रति,
विभागीय सहसंचालक, ........
पत्ता......

विषय:- परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजने अंतर्गत जमा असलेल्या रकमेच्या परताव्याकरीता लागणारेविवरणपत्र (नमुना-ड) पाठविण्याबाबत.

महोदय,

या कार्यालयात कार्यरत असलेले कर्मचारी श्री. / श्रीमती ------------------- यांचे दि.------- रोजी निधन झाल्यामुळे / त्यांनी दि.-------- पासून सेवेचा राजीनामा दिल्यामुळे/ त्यांनी दि.---------- पासून स्वेच्छानिवृत्ती पत्करल्यामुळे / त्यांना सेवेतून दि.-------- पासून बडतर्फ करण्यात आल्यामुळे / ------------ कारणाने सेवा संपल्याने /------------ (कारण नमूद करावे) या कारणामुळे त्यांची सेवा दि.----------- पासून संपुष्टात आलेली आहे. सदर कर्मचारी सेवेत असताना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेचे सभासद होते. उपरोक्त करणामुळे कर्मचाऱ्याची सेवा संपुष्टात आल्यामुळे त्यांच्या लेख्यात जमा असलेल्या रकमेचा परतावा त्यांनी नामनिर्देशित केलेल्या वारसदारास / त्यांना परत मिळण्याबाबत वारसदाराचा अर्ज / त्यांचा अर्ज प्राप्त झालेला आहे. त्यानुषंगाने सदर कर्मचाऱ्याचा तपशील खालीलप्रमाणे सादर करीत आहे.

| नाव | लेखा क्र. | सेवेत रूजू झाल्याचा दिनांक | सेवा समाप्तीच्या वेळी धारण केलेले पद | सध्याचा पत्ता | सेवेत रूजू झाल्याच्या दिनांकापासून सेवा समाप्तीच्या दिनांकापर्यंत तपशील दर्शवावा (आर्थिक वर्षानुरूप) | कर्मचाऱ्याने धारण केलेले पद | कार्यालयाचे नाव | कोषागाराचे नाव | संबंधित कोषागाराने प्रमाणित केल्याप्रमाणे या योजनेखालील वर्षवार जमा रकमा संबंधित आर्थिक वर्षातील अंतिम जमा रक्कम दर्शवावी. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | | |

वरील तपशीलाप्रमाणे सदर कर्मचारी आपल्या कोषागाराच्या कार्यकक्षेतील कार्यालयात कार्यरत असल्यामुळे सदर कर्मचाऱ्याच्या खाती जमा असलेल्या रकमेचे विवरणपत्र कृपया पाठवावे, ही

विनंती. सदर कर्मचाऱ्याच्या वेतनातून शेवटची वर्गणी माहे ---------२००----- च्या वेतनातून करण्यात आली असून सदर देयकाचा प्रमाणक क्रमांक ------- व दि.------ असा आहे.

यासोबत कर्मचाऱ्याच्या अर्जाची प्रत/वारसदाराच्या अर्जाची प्रत / मृत्यूच्या दाखल्याची प्रत तसेच इतर संबंधित कोषागारांकडून प्राप्त झालेल्या विवरणपत्राची (पत्रांच्या) मूळ प्रत/प्रती जोडली (ल्या) आहे/आहेत.

आपला/आपली विश्वासू,

(प्राचार्य/कुलसचिव)

सोबत :-

१) वारसदाराचा / कर्मचाऱ्याचा अर्ज.

२) मृत्यूचा दाखला.

३) ताळमेळ विवरणपत्र / विवरणपत्रे. (मूळ प्रत).

**नमुना - क**

**प्राचार्य/कुलसचिव यांनी परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजने अंतर्गत कर्मचाऱ्यांच्या लेख्यात जमा रकमेच्या परताव्यासंबंधी सहसंचालक................., यांना करावयाचा अर्ज.**

कार्यालयाचे नाव व पूर्ण पत्ता :

दिनांक :

प्रति,

विभागीय सहसंचालक, ...........

कार्यालयाचा पत्ता.....

विषय :- परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजने अंतर्गत जमा असलेल्या रकमेच्या परताव्याबाबत.

महोदय,

या कार्यालयात कार्यरत असलेले कर्मचारी श्री. / श्रीमती ------------------ यांचे दि.------ रोजी निधन झाल्यामुळे / त्यांनी दि.------- पासून सेवेचा राजीनामा दिल्यामुळे/ त्यांनी दि.---------- पासून स्वेच्छानिवृत्ती पत्करल्यामुळे / त्यांना सेवेतून दि.------- पासून बडतर्फ करण्यात आल्यामुळे / ------------ कारणाने सेवा संपल्याने /------------ (कारण नमूद करावे) या कारणामुळे त्यांची सेवा दि.----------- पासून संपुष्टात आलेली आहे. सदर कर्मचारी सेवेत असताना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेचे सभासद होते. उपरोक्त करणामुळे कर्मचाऱ्याची सेवा संपुष्टात आल्यामुळे त्यांच्या लेख्यात जमा असलेल्या रकमेचा परतावा त्यांनी नामनिर्देशित केलेल्या वारसदारास / त्यांना परत मिळण्याबाबत वारसदाराचा अर्ज / त्यांचा अर्ज प्राप्त झालेला आहे. त्यानुषंगाने सदर कर्मचाऱ्याचा तपशील खालीलप्रमाणे सादर करीत आहे.

| नाव | लेखा क्र. | सेवेत रूजू झाल्याचा दिनांक | सेवा समाप्तीच्या वेळी धारण केलेले पद | सेवा समाप्तीच्या वेळी धारण केलेले पद | सेवेत रूजू झाल्याच्या दिनांकापासून सेवा समाप्तीच्या दिनांकापर्यंत तपशील दर्शवावा (आर्थिक वर्षानुरूप) | पद | कर्मचारी कार्यरत असलेल्या कार्यालयाचे नाव | कोषागाराचे नाव | संबंधित कोषागाराने प्रमाणित केल्याप्रमाणे या योजनेखालील वर्षवार जमा रकमा संबंधित आर्थिक वर्षातील अंतिम जमा रक्कम दर्शवावी. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | | |

सदर कर्मचाऱ्याच्या वेतनातून शेवटची वर्गणी माहे --------२००----- च्या वेतनातून करण्यात आली असून सदर देयकाचा प्रमाणक क्रमांक ------- व दि.------ असा आहे.

यासोबत कर्मचाऱ्याच्या अर्जाची प्रत/वारसदाराच्या अर्जाची प्रत / मृत्यूच्या दाखल्याची प्रत तसेच इतर संबंधित कोषागारांकडून प्राप्त झालेल्या विवरणपत्राची (पत्रांच्या) मूळ प्रत / प्रती जोडली (ल्या) आहे/आहेत.

आपला/आपली, विश्वासू,

(प्राचार्य/कुलसचिव)

सोबत :-

१) वारसदाराचा / कर्मचाऱ्याचा अर्ज.

२) मृत्यूचा दाखला.

३) आर्थिक वर्षाच्या नमुना आर-२ मधील लेखाविवरणाची प्रत (Statement of Accounts)

## नमुना - ड

**परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजने अंतर्गत कर्मचाऱ्यांच्या लेख्यात जमा रकमेच्या ताळमेळासंबंधीचे विवरणपत्र**

(कर्मचारी शेवटी ज्या कोषागाराच्या अखत्यारितील कार्यालयांत कार्यरत होता त्या कोषागाराने द्यावयाचे विवरणपत्र)

(** ज्या वर्षाचे विवरणपत्र असेल त्या पूर्वीच्या वर्षातील अंतिम जमा रक्कम दर्शवावी)

(विवरणपत्र आर्थिक वर्षनिहाय तयार करावे.

| | | |
|---|---|---|
| कर्मचाऱ्याचे नाव | : | |
| लेखा क्रमांक | : | |
| कार्यालयाचे नाव | : | |
| सेवा संपुष्टात आल्याचा दिनांक | : | |
| सेवा संपुष्टात आली तेव्हा धारण केलेले पद | : | |
| कोषागार कार्यालयाचे नाव | : | |
| आर्थिक वर्ष | : | |

| सेवा संपुष्टात आली त्यावेळेचा कर्मचाऱ्याच्या लेख्याचा तपशील | | | | एकूण |
|---|---|---|---|---|
| (**कर्मचाऱ्याच्या खाती मागील वित्तीय वर्षाखेरीस जमा असलेली रक्कम (Opening Balance) | | | | |
| कर्मचाऱ्याच्या लेख्यात चालू वित्तीय वर्षात सेवा संपुष्टात येण्याच्या तारखेपर्यंत जमा झालेली रक्कम | | | | |
| महिना | कर्मचाऱ्याचे अंशदान | शासनाचे अंशदान | व्याज | |
| मार्च | | | | |
| एप्रिल | | | | |
| मे | | | | |
| जून | | | | |
| जुलै | | | | |
| ऑगस्ट | | | | |
| सप्टेंबर | | | | |
| ऑक्टोबर | | | | |
| नोव्हेंबर | | | | |
| डिसेंबर | | | | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| जानेवारी | | | | |
| फेब्रुवारी | | | | |
| एकूण | | | | |

प्रमाणित करण्यात येते की, संबंधित कर्मचाऱ्याच्या वैयक्तिक लेख्यात आणि ब्रॉडशिट मध्ये संबंधित वर्षात वर दर्शविल्याप्रमाणे नोंदी घेतलेल्या आहेत. आणि उपरोक्त रकमेचा ताळमेळ कोषागार लेख्याशी घेतला असता उपरोक्त रकमा बरोबर असल्याचे आढळून आले आहे.

(विभागीय सहसंचालक, ........यांची स्वाक्षरी)

नमुना क्रमांक- ई

क्र.-----------------/----
विभागीय सहसंचालक, ..........,
कार्यालयाचा पत्ता........
दिनांक :-

वाचा :-

१) शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. अनियो-२०१०/प्र.क्र.६७८/१०/विशि-१, दिनांक ..... नोव्हेंबर, २०१८.
२) प्राचार्य/कुलसचिव, (पत्ता................) यांच्याकडून प्राप्त झालेला दि.----- रोजीचा अर्ज.
३) श्री./ श्रीमती.---------- यांचा परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेखालील त्यांच्या / मृत कर्मचाऱ्याच्या खात्यातील रकमेचा परतावा मिळण्याकरीता प्राप्त झालेला दि.----- चा अर्ज.
४) विभागीय सहसंचालक, (पत्ता --------- ) यांचे या योजनेखालील कर्मचाऱ्याच्या सेवासमाप्तीच्या दिनांकापर्यंत रकमेबाबतचे विवरणपत्र. (नमुना-ड)

आदेश :-

उपरोक्त क्र.०२ अन्वये---------------------यांच्याकडून प्राप्त झालेल्या अर्जासोबत श्री./ श्रीमती ------------- यांच्या वर क्र.०३ येथे नमूद केलेल्या अर्जाच्या अनुषंगाने आणि क्रमांक............ येथील कोषागार अधिकाऱ्यांच्या विवरणपत्राच्या अनुषंगाने, संचालक, उच्च शिक्षण/तंत्रशिक्षण हे, त्यांना संदर्भ क्र. ०१ येथील शासन आदेश क्र.-------------- दि.-------- अन्वये प्राप्त असलेल्या अधिकारानुसार श्री./श्रीमती -------------- यांच्या लेखाखाती त्यांच्या सेवासमाप्तीच्या ------------दिनांकापर्यंत जमा झालेल्या एकूण रूपये------------- (अक्षरी रूपये -------------) एवढ्या रकमेचा परतावा श्री. /श्रीमती------------------ यांना मंजूर करीत आहे.

सदर परतावा शासकीय कर्मचाऱ्याची सेवा -------------------- या कारणामुळे दि.------ पासून संपुष्टात आल्यामुळे मंजूर करण्यात येत आहे.

विभागीय सहसंचालक तथा उपराज्य अभिलेख देखभाल
अभिकरण,
पत्ता........

प्रत :-

१) अधिदान व लेखाधिकारी/कोषागार अधिकारी------------- यांना माहिती तथा उचित कार्यवाहीस्तव.
२) संबंधित प्राचार्य/कुलसचिव यांना माहिती तथा उचित कार्यवाहीस्तव.
३) श्री. /श्रीमती-------------- यांना माहितीस्तव.